**प्रधानमंत्री मुद्रा योजनेच्या अनुषंगाने राज्यस्तरीय संमेलन बुधवार, दिनांक १९ डिसेंबर, २०१८ रोजी यशवंतराव चव्हाण केंद्र, मुंबई येथे आयोजित करण्यासाठी येणा-या खर्चास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: एसएलबीसी-१६१८/प्र.क्र.१७४/का-१४१७**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-३२
दिनांक: ०७ डिसेंबर, २०१८

वाचा: १) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. एसएलबीसी-१६१६/प्र.क्र.४९/का-१४१७ दिनांक १४ जून, २०१६

२) नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक एसएलबीसी-१६१७/प्र.क्र.८४/का-१४१७ दिनांक २५ एप्रिल, २०१७

३) नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक एसएलबीसी-१६१७/प्र.क्र.८४/का-१४१७ दिनांक २९ सप्टेंबर, २०१७

**प्रस्तावना:**

भारत सरकार, मुद्रा बँक योजना (Micro Units Development and Refinance Agency) दिनांक ८ एप्रिल, २०१५ रोजी संपूर्ण देशात कार्यान्वीत झाली आहे. सदर योजनेअंतर्गत कुठल्याही प्रकारचे तारण अथवा जामीनदाराशिवाय होतकरू बेरोजगार युवकांना कर्ज पुरवठा करून त्यांचे जीवनमान उंचावण्यासाठी केंद्र शासनाच्या मुद्रा योजनेअंतर्गत कर्जपुरवठा करण्यात येतो.

२. मा. वित्त व नियोजन मंत्री महोदयांनी विधीमंडळात दिनांक १८ मार्च, २०१६ रोजी राज्याचा अर्थसंकल्प सादर करताना केलेल्या भाषणामध्ये प्रधानमंत्री मुद्रा बँक योजनेचा लाभ जास्तीत जास्त तरुणांना मिळावा यासाठी या योजनेचा प्रचार, प्रसार व समन्वय करण्याकरीता जिल्हास्तरावर जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यात आलेली आहे. मुद्रा बँक योजनेच्या अंमलबजावणीबाबत अनेक बाबी जनतेकडून उपस्थित केल्या जात होत्या. त्याबाबत संनियंत्रण, समन्वय आणिआढावा घेणे आवश्यक असल्याने राज्यस्तरावर मुद्रा बँक योजनेचे संकेतस्थळ तयार करण्यात आले आहे.

३. त्याअनुषंगाने प्रधानमंत्री मुद्रा योजनेच्या अनुषंगाने राज्यस्तरीय संमेलन आयोजित करून सदर कार्यक्रमामध्ये प्रधानमंत्री मुद्रा योजनेच्या नवीन संकेतस्थळाचे उदघाटन प्रमुख मान्यवरांच्या उपस्थितीत यशवंतराव चव्हाण केंद्र, मुंबई येथे सकाळी ९.०० ते सायंकाळी ६.०० या कालावधीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

वरील बाबीस अनुसरून प्रधानमंत्री मुद्रा योजनेच्या अनुषंगाने राज्यस्तरीय संमेलन आयोजित करणेकामी खालीलप्रमाणे खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

१. कार्यक्रमासाठी आरक्षित करण्यात आलेल्या सभागृह आरक्षणापोटी व्यवस्थापक, यशवंतराव चव्हाण केंद्राकडून प्राप्त झालेल्या दरपत्रकानुसार रुपये १,१४,४००/- (रुपये एक लाख चौदा हजार चारशे फक्त) इतक्या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| Main Auditorium : Donation (Maintenance Charges)<br>Time (९ A.M to ६ P.M) | ८०,०००/- |
| CGST ९.००%<br>SGST ९.००% | ७,२००/-<br>७,२००/- |
| Deposit | २०,०००/- |
| Total Rs. | **१,१४,४००/-** |

२. यशवंतराव चव्हाण केंद्र, मुंबई येथे सेंट्रल केटरर्स (All Seasons) या संस्थेकडे जेवण/ अल्पोपहार इत्यादी सेवा पुरविण्याचा एकाधीकार आहे. सेंट्रल केटरर्स (All Seasons) या संस्थेकडून प्राप्त झालेल्या दरपत्रकानुसार रुपये **१,७८,२६०/-** (रुपये एक लाख अठ्ठयाहत्तर दोनशे साठ फक्त) इतक्या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | तपशील | दर | प्रमाण | एकूण रक्कम रु. |
|---|---|---|---|---|
| १ | Hi Tea ( दुपारी १.३० ते २.३० ) | ३७५ रु. + वस्तु व सेवा कर १८% | ३५० | १,५४,८७५/- |
| २ | TEA-COFFEE WITH BISCUITS (कार्यक्रमानंतर सायंकाळी ६.०० ते ७.००) | रु.३५/- + वस्तु व सेवा कर १८% | ३५० | १४,४५५/- |
| ३ | Bisleri Bottle २०० ml. | ८.०० रु. | ६०० | ४,८००/- |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ४ | VIP Hi Tea | १७५ रु. + वस्तु व सेवा कर १८% | २० | ४,१३०/- |
| | | **एकूण** | | **१,७८,२६०/-** |

३. सदरचा खर्च मागणी क्रमांक ओ-७, ३४५१ सचिवालय-आर्थिक सेवा, ०९०, सचिवालय (०१) नियोजन विभाग, मुद्रा बँक योजनेचा प्रचार, प्रसार आणि समन्वय (३४५१ अे ००१) (योजनांतर्गत) (दत्तमत), २६ जाहिरात व प्रसिध्दी या लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ मध्ये उपलब्ध असलेल्या मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

४. या लेखाशीर्षाखाली होणा-या खर्चासाठी उप सचिव (का-१४२२), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई हे नियंत्रक अधिकारी असतील व कार्यासन अधिकारी, का-१४२२, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई हे आहरण व संवितरण अधिकारी असतील. सदर निधीच्या खर्चाचा ताळमेळ ठेवण्याची तसेच खर्चाची माहिती वेळोवेळी शासनाला देण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकारी म्हणून उप सचिव, आस्थापना यांची राहील.

५. वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र. ३०/२०१३/विनियम भाग-२ दिनांक १७ एप्रिल, २०१५ वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला उप विभाग तीन अनुक्रमांक ४, परिच्छेद क्रमांक २७ (२) अन्वये प्रशासनिक विभागाला असलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१२०७१६३३३९१९१६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Priyanka Ranjan Chhapwale

Digitally signed by Priyanka Ranjan Chhapwale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2295c5c50b6a2aa03b2654fd2f5f69a709a20ae44359c483f3e1b0d4450728d0, cn=Priyanka Ranjan Chhapwale
Date: 2018.12.07 16:37:44 +05'30'

**( प्रियांका रं. छापवाले )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई-२३

२) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई-२३

३) मा. विरोधी पक्ष नेते, विधान सभा / विधान परिषद, यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई

४) मा. मंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव

५) अपर मुख्य सचिव (नियोजन) यांचे खाजगी सचिव

६) विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय (सर्व)

७) जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय (सर्व)

८) अधिदान व लेखा अधिकारी, बांद्रा कुर्ला कॉम्प्लेक्स, मुंबई-५१

९) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई

१०) उप सचिव (का-१४२२), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

११) कार्यासन अधिकारी, नियोजन विभाग (का-१४११ / का-१४२२ /का-१४२४), मुंबई-३२

१२) निवड नस्ती (का-१४१७), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.